मोर्शी जि.अमरावती येथे खुले कारागृह स्थापन करण्यासाठी निवासस्थाने व बरॅकीची दुरुस्ती करण्यासाठी येणाऱ्या खर्चास, अंदाजपत्रक आणि नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र.बीएलडी २००५/प्र.क्र.२३९/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक २२ नोव्हेंबर, २००५

वाचा :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.बीएलडी/मोर्शी/खुका/२००५ /कक्ष-३ /८३००, दि.०८.०९.२००५

**शासन निर्णय:-** मोर्शी जि.अमरावती येथे नवीन खुले कारागृह सुरु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तथापि, सदर कारागृहासाठी पाटबंधारे विभागाकडे अप्पर वर्धा पाटबंधारे प्रकल्पासाठी संपादीत केलेल्या जमिनीपैकी सदर प्रकल्प पूर्ण झाल्यामुळे मोकळी असलेली जमीन कारागृह विभागाकडे हस्तांतरीत करावयाची कार्यवाही चालू होती. ती पूर्ण होऊन पाटबंधारे खात्याने त्यांच्याकडे असलेली मोकळी जागा कारागृहासाठी हस्तांतरीत केली आहे. या ठिकाणी असलेल्या वसाहतीतील जुनी निवासस्थाने व बरॅकीमध्ये दुरुस्ती करुन कैदी ठेवावयाचे आहेत. सदर जुनी निवासस्थाने व बरॅकीच्या दुरुस्तीसाठी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी रु.१,५६,५१,३१०/- इतक्या खर्चाचा प्रस्ताव शासनास प्रशासकीस मान्यतेसाठी सादर केला आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासणी करतांना सेंटेज चार्जेससाठी करण्यात आलेली तरतूद वजा करुन रु.१,५०,७१,७००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दर्शविली आहे. त्यानुसार मोर्शी, जि.अमरावती येथे खुले कारागृह सुरु करण्यासाठी तेथील निवासस्थाने व बरॅक्स दुरुस्तीच्या खर्चासाठी येणा-या रु.१,५०,७१,७००/- (रुपये एक कोटी पन्नास लाख एकाहत्तर हजार सातशे फक्त) एवढ्या खर्चास तसेच अंदाजपत्रक व नकाशास शासन या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८, मुख्य लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, १०१ बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, प्रमुख

61\A:\1

बांधकामे (००)(१०) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा. प्रत्यक्ष निधी उपलब्ध झाल्यावरच काम सुरु करण्यात यावे .

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.३४२/इमारती-२, दि.२१.११.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार व वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ अन्वये वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग पाचच्या परिशिष्टातील अ.क्र.१ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

आ.ग.परदेशी

( आ.ग.परदेशी )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर
अधिक्षक, अमरावती मध्यवर्ती कारागृह, अमरावती
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/अमरावती
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती
उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, मोर्शी, जि.अमरावती
उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
निवडनस्ती पीआरएस-२ गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

*****